शालेय पोषण आहार योजनेंतर्गत अनुसूचित जमाती लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील राज्य हिस्स्याच्या निधी वितरणाबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२१/प्र.क्र.८५/एस.डी.३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २२ मार्च,२०२२

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०

२) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२१-Desk (MDM) दि.२४ मे, २०२१

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२०/प्र.क्र.१००/एस.डी.३, दि.१० ऑगस्ट, २०२१

५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२१/प्र.क्र.१०३/एस.डी.३, दि.१४ सप्टेंबर, २०२१.

६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.१५ मार्च, २०२२.

**प्रस्तावना :-**

शालेय पोषण आहार योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२१-२२ या वर्षाकरीता संदर्भाधिन दि.२४ मे, २०२१ रोजीच्या आदेशान्वये राज्य शासनास निधी उपलब्ध करुन दिला आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अवितरीत निधी आदिवासी विकास विभागाने अनुसूचित जमाती लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या वर्षामधील अर्थसंकल्पित तरतूदीमधून वितरणास मान्यता दिली होती. त्यानुसार संदर्भाधिन दि.१० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये निधी वितरीत केला आहे. तसेच, २४ मे, २०२१ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनाकडून अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा रु.३०३८.०८ लक्ष इतका निधी दि.१४ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तथापि, त्यास समरुप

राज्य हिस्स्याचा रु.२०२५.३९ लक्ष इतका निधी अवितरीत होता. सदर निधी वितरणाकरीता आदिवासी विकास विभागाने संदर्भाधिन दि.१५ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने प्रस्तुतप्रमाणे राज्य हिस्स्याच्या निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

शालेय पोषण आहार योजनेसाठी अनुसूचित जमाती उपयोजना लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील राज्य हिस्स्याचा रु.२०२५.३९ लक्ष (रुपये वीस कोटी पंचवीस लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) इतका निधी खालील लेखाशिर्षामधून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक टी - ५ २२०२ - सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, ७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - केंद्र पुरस्कृत योजना (०१) (०९) शालेय पोषण आहार कार्यक्रम (MDM) (केंद्र पुरस्कृत योजना) (अनुसूचित जमाती उपयोजना) (TSP) (राज्य हिस्सा ४०%) (२२०२।५४१) | रु.१२९४७.११ लक्ष | रु.२०२५.३९ लक्ष |
| **एकूण** | | **रु.१२९४७.११ लक्ष** | **रु.२०२५.३९ लक्ष** |

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२४ जून, २०२१ रोजीच्या परिपत्रकास, आदिवासी विकास विभागाच्या दि.१५ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयास तसेच, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९१/व्यय-१४, दि.०३ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत निधीचे वितरण तसेच खर्चाकरीता केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२२१२२२३८०२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, pseudonym=9D437DB3701DE5FE5D194241FCB9D73DC26031B1, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2022.03.22 12:24:09 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३